स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठात डॉ.शंकरराव चव्हाण अभ्यासिका संकुलाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक: एसआरटी -२०२०/प्र.क्र.३५/विशि-२
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२०.

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप-२०१३/प्र.क्र.३०/२०१३, दि.१७ एप्रिल, २०१५.
२) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा-२०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१, दि.११ जून, २०१८.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२० सप्टेंबर, २०१९.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५ सप्टेंबर २०१९.
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.शताब्दी-२०१९/प्र.क्र.१३५/२९अ, दि.२२ जानेवारी, २०२०.
६) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, यांचे दि.२५ जानेवारी, २०२० चे पत्र.

प्रस्तावना:-

जलक्रांतीचे जनक माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकररावजी चव्हाण यांचा दि.१४ जुलै, १९२० हा जन्मदिवस असल्याने, दि.१५ जुलै, २०१९ ते दि.१४ जुलै, २०२० पर्यंत त्यांचे जन्मशताब्दी वर्ष हे विविध कार्यक्रमाच्या माध्यमातून साजरे करुन त्यांच्या कार्याला उजाळा देण्याबाबत संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार स्वर्गीय शंकररावजी चव्हाण, माजी मुख्यमंत्री यांच्या जन्मशताब्दी प्रित्यर्थ विविध कार्यक्रम राबविण्याकरिता संबंधित प्रशासकीय विभागानी विविध कार्यक्रम हाती घेण्याचे प्रस्तावित केले आहे. त्यामध्ये उच्च व तंत्र शिक्षण विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत “माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या स्मरणार्थ नांदेड शहरात ग्रंथालय, स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र त्याचप्रमाणे मुला-मुलींचे वसतिगृह उभारणे,” ही कामे हाती घेण्याबाबत प्रस्तावित करण्यात आले आहे. अशा प्रकारच्या संकुलामध्ये नांदेड जिल्हा तसेच लगतच्या जिल्हयातील ग्रामीण भागातील हुशार व होतकरु विद्यार्थी-विद्यार्थिनींना तज्ञ मार्गदर्शन अत्यंत माफक शुल्कामध्ये प्राप्त होऊ शकेल, त्यामुळे ग्रामीण भागातील विद्यार्थी-विद्यार्थिनी भविष्यामध्ये प्रशासकीय सेवेमध्ये प्रवेशित होऊन, देशसेवेसाठी उपलब्ध होऊ शकतील. त्यानुषंगाने स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाच्या आवारामध्ये डॉ.शंकरराव चव्हाण अभ्यासिका संकुलाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ यांनी संदर्भाधीन दि.२५ जानेवारी, २०२० च्या पत्रान्वये स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाच्या आवारामध्ये डॉ.शंकरराव चव्हाण अभ्यासिका संकुलाच्या बांधकामाचे नकाशे व रु.५८८५.१८ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. सदर कामासाठी उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग इमारती, नांदेड यांनी सन २०१७-१८ च्या जिल्हा दर सूचीवर आधारीत तयार केलेले तसेच अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी साक्षांकित केलेले नकाशे व रु.५८८५.१८ लक्ष इतक्या रकमेचे अंदाजपत्रक सादर केले आहे.

३. स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाच्या आवारामध्ये डॉ.शंकरराव चव्हाण अभ्यासिका संकुलाच्या अंदाजपत्रकाची सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासणी केली. त्यामध्ये सुधारणा/दुरुस्ती केल्यानुसार रु.४४,७१,२६,०००/- (चव्वेचाळीस कोटी एकात्तर लाख सव्वीस हजार फक्त) एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाच्या आवारामध्ये मा.मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या स्मरणार्थ नांदेड शहरात ग्रंथालय, स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र त्याचप्रमाणे १०० मुला-मुलींचे वसतिगृह उभारणे इ. बांधकामांचे एकूण क्षेत्रफळ ८२३७ चौ.मी. इतके आहे.

२) अंदाजपत्रकातील तरतूदी अत्यंत ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या असल्याने सदर तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुन त्यास सक्षम स्तरावरुन तांत्रिक मान्यता घेवूनच काम हाती घेण्यात यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारत-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५) प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा वापर करावा अथवा उद्योग, ऊर्जा व कामगार विभागातील दि.२४.०७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये वस्तू व सेवा खरेदीकरिता केंद्र शासनाने विकसीत केलेल्या GeM पोर्टल कार्यपध्दतीचा अवलंब करणे शक्य आहे किंवा कसे, या बाबींचा स्वतंत्ररित्या विचार करावा.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्कता लागणार नाही. यादृष्टीने विशेष दक्षता घेउन काम करण्यात यावे.

८) प्रस्तावीत अभ्यासिका संकुलामधील १०० मुला-मुलींचे वसतीगृह व अभ्यासिका असे एकूण ८२३७ चौ.मी. चे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत झाल्यानंतर स्वामी रामानंद तीर्थ विद्यापीठ, नांदेड यांना हस्तांतरीत करावयाचे आहे.

९) प्रस्तावित बांधकाम टप्प्याटप्प्याने हाती घेण्यात यावे. **प्रथम टप्प्यामध्ये केवळ वसतीगृहाचे बांधकाम हाती घेण्यात यावे.**

५. ही मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२० सप्टेंबर, २०१९ अन्वये सुधारणा केल्यानुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-५, अनुक्रमांक-१, परिच्छेद क्र.१३४ नुसार इमारतीच्या बांधकामाच्या नकाशास व अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

६. सदर कामासाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (१९) स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांचा विकास (कार्यक्रम) (२२०२ ३५४८)- ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली २०२०-२१ मध्ये व त्यापुढील वर्षामध्ये मंजूर होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात येईल.

७. सदर कामाची सुरुवात सन २०२०-२१ या आर्थिक वर्षापासून सुरु होत आहे.

८. प्रस्तावित कामाचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे राहील:-

**(रु.लाखांत)**

| **आर्थिक वर्ष** | **अपेक्षित खर्च** | **या लेखाशिर्षाखाली सुरु असलेल्या इतर कामांसाठी आवश्यक तरतूद** | **एकूण मंजूर तरतूद (२०१९-२०)** |
|---|---|---|---|
| २०१९-२० | -- | ४३१.०० | ३८१.३८ |
| २०२०-२१ | १०५०.०० | -- | -- |
| २०२१-२२ | १७१०.६३ | -- | -- |
| २०२२-२३ | १७१०.६३ | -- | -- |

९. स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाच्या अधिपत्याखालील सुरु असलेल्या सर्व कामांच्या वित्तीय नियोजनाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

**(रु.लाखांत)**

| अ. क्र. | कामाचे नाव | एकूण अपेक्षित खर्च | मागील वर्षाअखेर (मार्च २०१९) झालेला खर्च | २०१९-२० मध्ये अपेक्षित खर्च | पुढील वर्षासाठी carry forward करावयाची तरतूद | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | अ | ब | क |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | | |
| १ | स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांचा विकास (कार्यक्रम) (२२०२ ३५४८) | १४४५.०० | १०१४.०० | ३८१.३८ | ४३१.०० | -- | -- |
| | **एकूण** | **१४४५.००** | **१०१४.००** | **३८१.३८** | **४३१.००** | **--** | **--** |

१०.    हा शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६२०/इमा-३, दि.१४ फेब्रुवारी, २०२० व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या (HPC) दि.२० फेब्रुवारी, २०२० रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२८१९०५१८९००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jakhate Kishor Mahadeo

Digitally signed by Jakhate Kishor Mahadeo
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83112e1445917d0a21fbab36d7c0ff41e09863c93a2e62ea1b0c01da16b7a161, serialNumber=032a6acbfd529d66dd76e26eab14b28c6dd07d2f776e529b44ba2cb45324c503, cn=Jakhate Kishor Mahadeo
Date: 2020.02.28 19:07:21 +05'30'

**(कि. म. जकाते)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे. (५ प्रती)
६) सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड
७) कुलगुरु, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
८) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१०) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
११) सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे /नांदेड.
१३) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१५) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१६) कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती (विशि -२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.